**अंब्रेला एकात्मिक बाल विकास सेवा योजना या मुख्य योजनेतंर्गत राबविण्यात येणा-या उपयोजनांची नवीन नावे लागू करणे व योजनांमधील विविध बाबींचे सुधारित दर लागू करणेस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबाविं-२०१७/प्र.क्र.३४८/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : **३० जून, २०१८**

**वाचा** :- १) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय :- एबाविं-२०१४/प्र.क्र.६९/का.६,दि. ३० एप्रिल २०१४
२) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय :- एबाविं-२०१४/प्र.क्र.२४६/का.६,दि. २० जुलै २०१७
३) केंद्र शासन महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. No.११-३६/२०१६-CD.I दिनांक २३ नोव्हेंबर, २०१७ चे पत्र.
४) केंद्र शासन महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. F.No.CD-II- १४/२/२०१७ CD-II, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१७ चे पत्र.
५) केंद्र शासन महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र F.No.CD-II- १४/२/२०१७ CD-II, दिनांक ८ डिसेंबर२०१७
६) मा.मंत्रिमंडळाचा दिनांक ५ जून २०१८ चा निर्णय.

**प्रस्तावना** :-

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेची सुरुवात सन १९७५ पासून महाराष्ट्र राज्यात झाली. क्रमाक्रमाने योजनेच्या प्रकल्प संख्येत वाढ होऊन राज्यातील विविध नागरी, ग्रामीण व आदिवासी क्षेत्रात प्रकल्प कार्यन्वीत करण्यात आलेले आहेत. या योजनेअंतर्गत अंगणवाडीच्या माध्यमातून बालके, गरोदर स्त्रिया व स्तनदा माता यांना ६ महत्त्वाच्या सेवा उदा. लसीकरण, पूर्व प्राथमिक शिक्षण, पुरक पोषण आहार, संदर्भ सेवा, आरोग्य तपासणी, १५ ते ४५ वयोगटातील स्त्रियांना आरोग्य व पोषण विषयक शिक्षण, इत्यादीचा सेवा पुरविण्यात येतात. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने प्रत्येक प्रकल्पस्तरावर बाल विकास प्रकल्प अधिकारी व इतर आवश्यक यंत्रणाही कार्यरत आहेत. तीव्र कमी वजनांच्या बालकांचे प्रमाण जास्त असलेल्या भागात पोषण आहार आणि पुर्व प्राथमिक शिक्षण या सोबत बालविकास कार्यक्रमाची फलनिष्पती सुधारण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणे याकरिता केंद्र शासनाने एकात्मिक बाल विकास सेवायोजनेचे बळकटीकरण व पुनर्सरचना ही नविन योजना महाराष्ट्रातील निवडक २० जिल्हयांकरीता दिनांक ३०/४/२०१४ च्या शासन निर्णयान्वये लागू केलेली आहे.

महाराष्ट्रातील निवडक २० जिल्हे खालीलप्रमाणे आहेत.

| अ.क्र. | जिल्हे | अ.क्र. | जिल्हे |
|---|---|---|---|
| १ | वर्धा | ११ | धुळे |
| २ | नंदुरबार | १२ | बीड |
| ३ | बुलढाणा | १३ | अमरावती |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | नांदेड | १४ | जालना |
| ५ | गडचिरोली | १५ | नागपुर |
| ६ | चंद्रपुर | १६ | सांगली |
| ७ | जळगांव | १७ | मुंबई |
| ८ | वाशिम | १८ | हिंगोली |
| ९ | अहमदनगर | १९ | नाशिक |
| १० | परभणी | २० | गोंदिया |

सदर योजनेतंर्गत खालील कार्यक्रम राबविण्यात येत आहेत.

| | |
|---|---|
| १ | पुरक पोषण आहार, |
| २ | औषधी संच, पूर्व शालेय शिक्षण संच, अंगणवाडी केंद्राचे व बाल विकास प्रकल्प अधिका-यांच्या कार्यालयाचे भाडे, सनियंत्रण व मुल्यमापन, पेट्रोल तेल वंगण, माहिती शिक्षण व संवाद, (IEC), गणवेष व बिल्ले , अंगणवाडी व प्रकल्प कार्यालय आकस्मिक खर्च, पूर्व बाल्यावस्थेतील देखभाल व शिक्षण दिवस साजरा करणे, साधनसामुग्री प्रशासनिक खर्च, अंगणवाडी बांधकाम, बांधकाम विस्तार, व इमारत देखभाल इ.. |
| ३ | पूर्व बाल्यावस्थेतील देखरेख व शिक्षण (ECCE), पूर्व शालेय शिक्षण, आहार व आरोग्य विषयक शिक्षण, प्रचार प्रसार व समुपदेशन, मातांची काळजी, कमी वजनांच्या बालकांची काळजी घेणे इ. |
| ४ | मध्यम व तीव्र कमी वजनाच्या (MUW, SUW) बालकांचे सनियंत्रण,स्नेह शिबिर इ. |

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई हे या योजनेचे विभाग प्रमुख असून सचिव, महिला व बाल विकास विभाग हे मंत्रालय स्तरावर प्रशासकीय प्रमुख आहेत. ही योजना सन २०१२-१३ पासून २० जिल्हयात राबविण्यात येणार होती. तथापि तिची अंमलबजावणी सन २०१४-१५ पासून करण्यात आलेली आहे.

३. एकात्मिक बाल विकास सेवायोजनेचे बळकटीकरण व पुर्नरचना योजना सन २०१४-१५ मध्ये दिनांक १-४-२०१४ पासून राज्यातील उर्वरित सर्व १५ जिल्हयांत लागु करण्याचे केंद्र शासनाने दिनांक १७ जानेवारी २०१४ च्या पत्रान्वये कळविले होते. तथापि सदर योजना सन २०१७-१८ पासून उर्वरित १५ जिल्हयात राबविण्याचे प्रस्तावित होते. केंद्र शासनाने केंद्र व राज्य यांच्या हिश्याच्या प्रमाणात सन २०१५-१६ पासून केंद्र ६० % व राज्य ४०% असा बदल (पोषण वगळता ) सर्व बाबींमध्ये केलेले आहेत. एकात्मिक बाल विकास सेवायोजनेचे बळकटीकरण व पुर्नरचनेमध्ये समाविष्ट असलेल्या बाबींपैकी अतिरिक्त अंगणवाडी सेविका, स्नेह शिबिर हे दोन कार्यक्रम २० जिल्हयांत राबवावयाचे आहेत. या प्रकल्पाअंतर्गत योजना राबविण्यासाठी प्रस्तावित असलेले महाराष्ट्रातील उर्वरीत १५ जिल्हयांचा तपशील खालीलप्रमाणे आहे. एकात्मिक बाल विकास सेवायोजनेचे बळकटीकरण व पुनर्सरचना ही योजना सन २०१७-१८ पासून राज्यातील उपरोक्त उर्वरित सर्व १५ जिल्हयांत लागु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | कोल्हापूर | ११ | रायगड |
| २ | उस्मानाबाद | १२ | औरंगाबाद |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | यवतमाळ | १३ | भंडारा |
| ४ | रत्नागिरी | १४ | ठाणे |
| ५ | अकोला | १५ | पालघर |
| ६ | लातूर | | |
| ७ | सिंधुदुर्ग | | |
| ८ | सोलापूर | | |
| ९ | सातारा | | |
| १० | पुणे | | |

४. राज्यातील २० जिल्हयात लागू करण्यात आलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचना ही योजना राज्यातील उर्वरीत १५ जिल्हयांत लागु करण्याबाबतचा प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ३-७-२०१७ रोजी झालेल्या बैठकीत विचारार्थ मान्यतेस्तव सादर करण्यात आला होता. यावर विचारविनिमय होऊन एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पुनर्संरचनेतंर्गत फक्त “पुरक पोषण आहार” हा घटक सुधारित दरानुसार सन २०१७-१८ पासून १५ जिल्हयांत लागु करण्यास दिनांक २० जुलै २०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

५. केंद्र शासनाने **अंब्रेला एकात्मिक बाल विकास सेवायोजना या मुख्य योजेनेखाली** एकात्मिक बाल विकास सेवा योजना मध्ये समाविष्ट केलेल्या योजनांमधील उपयोजनांची नावे खालीलप्रमाणे आहेत.

| अ. क्र. | सध्याचे नाव | समाविष्ट केलेली उपयोजना |
|---|---|---|
| १. | एकात्मिक बाल विकास सेवा योजना | अंगणवाडी सेवा |
| २. | सबला योजना | किशोरवयीन मुलींसाठी योजना |
| ३. | एकात्मिक बाल संरक्षण योजना | बाल संरक्षण सेवा |
| ४. | राजीव गांधी राष्ट्रीय पाळणाघर योजना | राष्ट्रीय पाळणाघर योजना |

तसेच अंगणवाडी सेवांमधील विविध बाबींच्या दरांमध्ये व मापदंडामध्ये सुधारणा केलेली आहे. सदर सुधारित दर दिनांक १ एप्रिल २०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ व दिनांक १/१२/२०१७ ते ३०/११/२०१८ या कालावधीसाठी सुधारित तरतूदी, पोषण आहाराबाबतचे सुधारित दर लागू केलेले आहेत. त्याची अंमलबजावणी (APIP) प्रमाणे करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

केंद्र शासनाने **अंब्रेला एकात्मिक बाल विकास सेवायोजना या मुख्य योजेनेखाली** एकात्मिक बाल विकास सेवा योजना मधील उपयोजनांची नावे खालीलप्रमाणे बदलेली आहेत.

| अ. क्र. | सध्याचे नाव | समाविष्ट केलेली उपयोजना |
|---|---|---|
| १. | एकात्मिक बाल विकास सेवा योजना | अंगणवाडी सेवा |
| २. | सबला योजना | किशोरवयीन मुलींसाठी योजना |
| ३. | एकात्मिक बाल संरक्षण योजना | बाल संरक्षण सेवा |
| ४. | राजीव गांधी राष्ट्रीय पाळणाघर योजना | राष्ट्रीय पाळणाघर योजना |

तसेच अंगणवाडी सेवांमधील विविध बाबींच्या दरांमध्ये व मापदंडामध्ये सुधारणा केलेली आहे. सदर सुधारणा दिनांक १ एप्रिल २०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ व दिनांक १/१२/२०१७ ते ३०/११/२०१८ या कालावधीसाठी लागु केलेले आहेत. सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील **"अंगणवाडी सेवा"** या उप योजनेखालील घटकनिहाय बाबींचे सोबतच्या विवरणपत्र दर्शविण्यात आलेले सुधारित दर सुधारित तरतूदी, पोषण आहाराबाबतचे सुधारित दर लागू करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. पुरक पोषण आहाराचे सुधारित दर **दिनांक १ ऑगस्ट २०१८ ते दिनांक ३०/११/२०१८ पर्यंत** लागु होतील. उर्वरित सर्व बाबींसाठी लागु असलेले सुधारित दर सन २०१८-१९ वित्तीय वर्षापासून **दिनांक १/४/२०१८ ते दिनांक ३०/११/२०१८ पर्यंत** लागु रहातील. त्यानंतर केंद्र शासनाकडून प्राप्त होणा-या सूचनांनुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.

३. अंगणवाडी सेवा या उपयोजनेखाली राबविण्यात येणाऱ्या विविध बाबींचे दर राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये यापुढे समान रहातील.

४. अंगणवाडी सेवा या उपयोजनेखाली सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमुद केलेल्या बाबींसाठीच यापुढे निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्यामुळे यापूर्वी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत अन्य बाबींसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येत असल्यास अशा बाबीं यापुढे राबविण्यात येऊ नयेत. सन २०१८-१९ पासून सदर बाबी खंडीत करण्यात येत आहेत.

५. केंद्र शासनाने अंगणवाडी सेवा या उपयोजनेखाली कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतनविषयक बाबींमध्ये केंद्र व राज्य हिश्यामध्ये २५ : ७५ असा बदल केलेला आहे. तसेच काही पदांचे वेतन यापुढे केंद्र शासन देणार नसल्यामुळे राज्य शासनास १००% अदा करावे लागणार आहे. अंब्रेला एकात्मिक बाल विकास सेवा योजना या मुख्य योजनेखाली अंगणवाडी सेवा या उपयोजनेखाली कार्यरत सर्व पदांचा सुधारित आकृतीबंध तातडीने मंजूर करुन घेण्यात यावा.

६. अंगणवाडी सेवा या उपयोजनेतर्गत राबविण्यात येणा-या बाबींसाठी सन २०१८-१९ मध्ये रुपये ४१९.९२ कोटी सर्वसाधारण योजनेमधुन उपलब्ध करुन देण्यास मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर निधी यथावकाश अर्थसंकल्पित करण्यात यावा.

७. अंब्रेला एकात्मिक बाल विकास सेवायोजना या मुख्य योजेनेखाली राबविण्यात येणा-या उपयोजनेतील बाबींसाठी आवश्यक तेथे केंद्र व राज्य हिश्याचा निधी अर्थसंकल्पित करण्यास नविन लेखाशिर्ष उघडण्यास मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे, त्यानुसार नविन लेखाशिर्ष घेण्यात यावीत.

८. **बाल संरक्षण सेवा** ही उप योजना अंब्रेला एकात्मिक बाल विकास सेवायोजना या मुख्य योजेनेखाली दर्शविण्यात आली असली तरी सदर योजनेची अंमलबजावणी आयुक्त महिला व बाल विकास, पुणे यांच्याकडून करण्यात येईल. सदर योजनेसाठी निधीची केंद्र शासनाकडे मागणी करताना APIP मध्ये सदर योजनेचा समावेश करण्यासाठी वेळेत प्रस्ताव आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांच्याकडे सादर करण्याची दक्षता आयुक्त महिला व बाल विकास,पुणे यानी घ्यावी. तसेच APIP मंजूर

करताना केंद्रीय मंत्री, महिला व बाल विकास यांनी खालील निर्देश दिलेले आहेत त्याची अंमलबजावणी करण्यात यावी.

| अ.क्र | केंद्र शासनाने दिलेल्या सूचना |
|---|---|
| १ | सर्व राज्यांनी लाभार्थ्यांची मोजणी त्वरीत करावी |
| २ | सर्व राज्यांनी मागील वर्षांची खर्चाचे तपशील कमी किंवा जास्त झाला असेल त्याप्रमाणे सादर करावा. त्याबाबतचे हिशेब या वर्षाच्या तिसऱ्या तिमाहीत सेटल करावेत. |
| ३ | केंद्रीय मंत्रालय विविध राज्यातील अंगणवाडयांना आकस्मित भेट देईल व जर गैरप्रकार निदर्शनास आल्यास राज्याच्या अनुदानामध्ये कपात करेल. |
| ४ | **पीएसई किट / मेडिसीन किट :-** सदर बदललेले दर हे दिनांक १ डिसेंबर, २०१७ ते दिनांक ३१ मार्च, २०१८ साठी लागू असतील. पीएसई किट व मेडिसीन किट हे आधीच खरेदी केले असल्यास हे जुन्या दरांप्रमाणे किंवा राज्य शासनाने केलेला खर्च यापैकी जे कमी असेल तेच लागू असेल. |
| ५ | **अंगणवाडी बांधकाम :-** अंगणवाडी इमारतींच्या बांधकामाबाबत सदर बांधकाम मनरेगा मधून करण्यात येत असल्यास, त्याबाबतच्या मार्गदर्शक तत्त्वाप्रमाणे परिपुर्ण प्रस्तावासह सादर केल्यानंतर व बांधकाम पुर्ण झाल्यानंतर रु.१.०० लक्ष प्रमाणे प्रतिपुर्ती करण्यात येईल. दुसरा हप्ता मिळण्यासाठी २०१३-१४, २०१४-१५, २०१५-१६ आणि २०१६-१७ या वर्षातील बांधकामांचा अहवाल एसओई/उपयोगिता प्रमाणपत्र व कामाच्या प्रगती अहवालासह सादर करावा. |
| ६ | **आधार :-** प्रत्येक अंगणवाडी प्रोजेक्टसाठी रु.१.५० लक्ष प्रति संच प्रमाणे आधार नोंदणीचे ३ संच, सुधारित APIP मध्ये मंजूर केले आहेत. सदर कार्यक्रमासाठी प्रौढांसाठी संगणक व लॅपटॉप व ५ वर्षाखालील मुलांसाठी टॅबलेटस्, फिंगर प्रिंट स्कॅनर व जीपीएस डिव्हाईस UIDIA च्या स्पेसिफिकेशन नुसार खरेदी करावेत. त्यासाठी GEM पोर्टल वरुन खरेदी करण्याबाबत निर्देश आहेत. राज्याने संपुर्ण राज्याची आवश्यकता निधी वितरीत करण्यासाठी कळवावी. |
| ७ | राज्यांनी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र शासनास वेळेवर सादर करावीत |

हा शासन निर्णय मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ५ जून २०१८ रोजी झालेल्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२०९४९१८४९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.07.02 12:00:21 +05'30'

(ला.रा.गुजर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
६. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान सचिव ( ले व को.),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
१५. आयुक्त, कुटुंब कल्याण सार्वजनिक आरोग्य विभाग, पुणे
१६. आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक
१७. आयुक्त, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, पुणे
१८. सर्व विभागीय आयुक्त
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
२२. उप सचिव (एबाविसेयो), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. उपआयुक्त (अंगणवाडी), एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
२४. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
२५. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
२६. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
२७. सर्व मंत्रालयीन विभाग
२८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२२. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
२३. सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२७. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२८. निवड नस्ती (कार्यासन ६)

**शासन निर्ण क क्रमांक :-एबावि-२०१७/प्र.क्र.३४८/का.६,दिनांक ३० जून २०१८ सहपत्र**

अंब्रेला (UMBRELA) एकात्मिक बाल विकास सेवायोजना या मुख्य योजेनेखाली **“ अंगणवाडी सेवा”** हया उपयोजनेखाली राबविण्यात येणा-या कार्यक्रमासाठीचे बाबनिहाय जुने दर व नविन दर याबाबतची माहिती दर्शविणारे विवरणपत्र.

**( दिनांक १ एप्रिल २०१७ ते दिनांक ३०/११/२०१७ व दिनांक १/१२/२०१७ ते ३०/११/२०१८ या कालावधीसाठी)**

| विद्यमान दर ( तरतुदी) | | | | | सुधारित दर ( तरतुदी) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | खर्चाची बाब | राज्य/जिल्हा /प्रकल्प/ अं.केंद्र /मिनी अं.केंद्र **विद्यमान दर ( तरतुदी)** | दर रु. | केंद्र व राज्य हिस्सा प्रमाण | राज्य/जिल्हा /प्रकल्प/ अं.केंद्र /मिनी अं.केंद्र **सुधारित दर (तरतुदी)** | केंद्र व राज्य हिस्सा प्रमाण | नविन दरानुसार अनुज्ञेय वाढीची रक्कम |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | | ८ |
| १ | पुरक पोषण आहार (संबधित राज्य / केंद्र शासित प्रदेशाच्या अधिसूचना जारी केल्यानुसार) | सर्वसाधारण बालके (६ म.ते ७२ महिने) (३०० दिवस) | रु. ६/- प्रतिदिन (२.५०+२.५०) | ५०:५० | रु. ८/- प्रतिदिन (४.००+४.००) | ५०:५० | रुपये २/- |
| | | तीव्र कमी वजनाची बालके (६ म ते ७२ महिने ) (३०० दिवस) | रु. ९/- प्रतिदिन (४.५०+४.५०) | | रु. १२/- प्रतिदिन (६.००+६.००) | | रुपये ३/- |
| | | गरोदर/स्तनदा माता (३०० दिवस) | रु.७/- प्रतिदिन (३.५०+३.५०) | | रु.९.५०/- प्रतिदिन (४.७५+४.७५) | | रुपये २.५० |
| २ | औषधी संच | अंगणवाडी केंद्र | रु. १,०००/- | ६०:४० | रु. १,५००/- प्रतिवर्ष | ६०:४० | रुपये ५००/- |
| | | मिनी अंगणवाडी केंद्र | रु. ५००/- | | रु. ७५०/- प्रतिवर्ष | | रुपये २५०/- |
| ३ | पुर्व शालेय शिक्षण संच/ईसीसीई (प्रशिक्षणासहीत) | अंगणवाडी केंद्र | रु.३,०००/- | ६०:४० | रु.५,०००/- प्रतिवर्ष पुर्व शालेय संच,कृती पुस्तीका इ.) | ०:४० | रुपये २,०००/- |
| | | मिनी अंगणवाडी केंद्र | रु.१,५००/- | | रु.५,०००/- प्रतिवर्ष पुर्व शालेय संच,कृती पुस्तीका इ.) | | रुपये ३५००/- |
| ४ | माहिती शिक्षण व सपंर्क | जिल्हा कक्ष | रु.१,००,०००/- | | खंडीत | | - |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | (IEC ) | प्रकल्प कक्ष | रु.५०,०००/- | ६०:४० | खंडीत | ६०:४० | - |
| | | अंगणवाडी केंद्र/ मिनी अंगणवाडी | रु.१०००/- | | रुपये १०००/- प्रतिवर्ष | | - |
| ५ | आकस्मिक खर्च/ प्रशासकीय खर्च | राज्यस्तर कक्ष | रु.४,००,०००/- | ६०:४० | खंडीत | ६०:४० | --- |
| | | जिल्हा कक्ष | रु.१,००,०००/- | | खंडीत | | -- |
| | | प्रकल्प कक्ष | रु.६०,०००/- | | खंडीत | | -- |
| | | अंगणवाडी केंद्र | रु.१,०००/- | | रुपये २०००/- प्रतिवर्ष | | रुपये १०००/- |
| | | मिनी अंगणवाडी केंद्र | रु.५००/- | | रुपये १०००/- प्रतिवर्ष | | रुपये ५००/- |
| ६ | भाडे | राज्यस्तर कक्ष | निरंक | ६०:४० | खंडीत | ६०:४० | |
| | | जिल्हास्तर | निरंक | | खंडीत | | |
| | | प्रकल्पस्तर कक्ष<br>अ) ग्रामीण/आदिवासी<br>ब) नागरी | ६६००/- प्र.मा.<br>६६००/- प्र.मा. | | खंडीत | | |
| | | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केद्र (ग्रामीण/आदिवासी ) | रु.९०००/-<br>(रु.७५०/- प्रतिमाह) | | रुपये १०००/- प्रतिमाह | | रुपये २५०/- |
| | | अंगणवाडी केंद्र/ मिनी अंगणवाडी केद्र (नागरी ) | रु.३६,०००/-<br>(रु.३,०००/- प्रतिमाह) | | रुपये ४०००/- प्रतिमाह | | रुपये १,०००/- |
| | | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केद्र नागरी ( महानगर) | रु.६०,०००/-<br>(रु.५,०००/- प्रतिमाह | | रुपये ६०००/- प्रतिमाह | | रुपये १,०००/- |
| ७ | पेट्रोल तेल वंगण (POL) वाहने भाडे तत्वावर घेणे | राज्य कक्ष | अ) स्वत:चे वाहन प्रतिवर्ष-रु.१,२०,०००/-<br>ब) भाडयाचे वाहन प्रतिवर्ष रु.२,१५,०००/- | | खंडीत | | -- |
| | | जिल्हा कक्ष | रु.१,५०,०००/-<br>स्वत:चे वाहन प्रतिवर्ष | ६०:४० | रुपये १,९०,०००/-<br>(पेट्रोल,तेल व वंगण प्रतिवर्ष) | | पेट्रोल,तेल व वंगण प्रतिवर्ष |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | रु.२,२५,०००/- वाहन भाडयाने घेणे प्रतिवर्ष | | रुपये २,५०,०००/-<br>(भाडे तत्वावर वाहने प्रतिवर्ष) | | रुपये ४०,०००/-<br>(भाडे तत्वावर वाहने प्रतिवर्ष)<br>रुपये २५,०००/- |
| | | प्रकल्प कार्यालय | रु.१,७५,०००/- | ६०:४० | रुपये १,९०,०००/-<br>(पेट्रोल,तेल व वंगण प्रतिवर्ष)<br><br>रुपये २,५०,०००/-<br>(भाडे तत्वावर वाहने प्रतिवर्ष) | | पेट्रोल,तेल व वंगण प्रतिवर्ष<br>रुपये १५,०००/-<br>(भाडे तत्वावर वाहने प्रतिवर्ष)<br>रुपये ७५,०००/- |
| ८ | सनियंत्रण व देखरेख मुल्यमापन | अंगणवाडी केंद्र | रु.१,०००/- | ६०:४० | रु.१,५००/- प्रतिवर्ष | ६०:४० | रुपये ५००/- |
| | | मिनी अंगणवाडी केंद्र | रु.१,०००/- | | रु.१,५००/- प्रतिवर्ष | | रुपये ५००/- |
| | | अंगणवाडी केंद्र ICT | रु.५०/- | | | | -- |
| ९ | फर्निचर व इक्वीपमेंट (अनावर्ती ५ वर्षातून एकदा या प्रमाणे एका वर्षातील अपेक्षित तरतुद)<br>(सुरक्षित स्वच्छ पाण्यासाठी वॉटर फिल्टर, फर्निचर उपकरणे इ.) | राज्यस्तर कक्ष | रु.१,००,०००/- वार्षिक | ६०:४० | खंडीत | | -- |
| | | जिल्हा कक्ष | रु.८०,०००/- वार्षिक | | खंडीत | ६०:४० | --- |
| | | प्रकल्प कार्यालय | रु.४०,०००/- वार्षिक | | खंडीत | | -- |
| | | अंगणवाडी केंद्र | रु.१,४००/- वार्षिक | | रु.१०,०००/- प्रतिवर्ष | | रुपये ८,६००/- |
| | | मिनी अंगणवाडी केंद्र | रु.१,०००/- वार्षिक | | रु.७,०००/- प्रतिवर्ष | | रुपये ६,०००/- |
| १० | अंगणवाडी सेविका/ मिनी अंगणवाडी सेविका / मदतनीस यांनी साडी/ स्थानिक पोषाखसाठी प्रत्येकी दोन संच गणवेष | अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका | रु.६००/- | ६०:४० | रु.८००/-<br>(रुपये ४००/- प्रती साडी) | ६०:४० | रुपये २००/- |
| | बॅचेस | अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी | रु.२५/- | | खंडीत | | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अंगणवाडी सेविका | | | | | |
| ११ | वजनकाटे | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र | रु.५,०००/- | ६०:४० | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्रासाठी नविन राष्ट्रीय पोषण मिशनमध्ये समाविष्ट (NNM) मधुन खरेदी करण्यात यावेत.<br>राष्ट्रीय पोषण मिशनमध्ये प्रचलित मापदंड लागू हाईपर्यंत उपकरणे / फर्निचर या बाबी मधून सदरील खर्च भागविण्यात येईल. | ८०:२० | - |
| १२ | अंगणवाडी केंद्र इमारत बांधकाम (नविन इमारत) | अंगणवाडी केंद्र | रु.६,००,०००/-<br>(राज्य शासनाकडुन निर्धारित दर) | ६०:४० | खंडीत<br>(१ला हप्ता दिलेल्या अंगणवाडी केंद्र इमारतींसाठी प्रचलित नियमांनुसार २ हप्ता) | ६०:४० | |
| १३ | अंगणवाडी केंद्र इमारतींची श्रेणीवर्धन करणे | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र | रु.१,००,०००/- | ६०:४० | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र<br>रु.२,००,०००/- प्रति अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र | ६०:४० | |
| १४ | अंगणवाडी केंद्र इमारतींची देखभाल व दुरुस्ती | अंगणवाडी केंद्र/ मिनी अंगणवाडी केंद्र | रु.२,००० | ६०:४० | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र रु.३,०००/- प्रतिवर्षी<br>(सरकारी मालकीच्या आंगणवाडी केंद्र इमारतींसाठी) | ६०:४० | रुपये १,०००/- |
| १५ | अंगणवाडी केंद्र इमारतीचे बांधकाम अभिसरण महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण योजना | अंगणवाडी केंद्र | ० | ० | अंगणवाडी बांधकामासाठी केंद्र शासनाचा सहभाग प्रतिवर्षी १ लक्ष अंगणवाडया बांधणे. बाधकाम पुर्ण झाल्यानंतर प्रत्येकी रु.१.०० लाख इतका निधी मंजूर करण्यात येईल.<br>(१ ला हप्ता दिलेल्या अंगणवाडी केंद्र इमारतींसाठी प्रचलित नियमानुसार २ रा हप्ता) | ६०:४० | |
| १६ | अनटायड (UNTIED FUND) फंड विशेष गरजा असलेल्या मुलांसाठी | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र | प्रति बालक रु.२०००/- | | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र<br>रु.३,०००/- प्रति बालक | ६०:४० | याबाबत स्वतंत्र सूचना निर्गमित करण्यात |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | (उदा.अपंग मुलांसाठी) | | | | | | येतील. |
| १७ | मानधन | अंगणवाडी सेविका / मिनी अंगणवाडी सेविका/ अंगणवाडी मदतनीस | अंगणवाडी सेविका - रु.३,०००/- (प्रतिमाह)<br><br>मिनी अंगणवाडी सेविका - रु.२,२५०/- प्रतिमाह<br><br>अंगणवाडी मदतनीस - रु.१,५००/- प्रतिमाह | ६०:४० | अंगणवाडी सेविका - रु.३,०००/- (प्रतिमाह)<br>मिनी अंगणवाडी सेविका - रु.२,२५०/- (प्रतिमाह)<br>अंगणवाडी मदतनीस - रु.१,५००/- (प्रतिमाह) | ६०:४० | -- |
| १८ | प्रशिक्षण | १) अंगणवाडी सेविका / मिनी अंगणवाडी सेविका/ मदतनीस (AWTC)<br>२) पर्यवेक्षिका/मुख्यसेविका (MLTC) | | ६०:४० | सध्याच्या नियमानुसार | ६०:४० | |
| १९ | पुरस्कार/अवॉर्ड | अंगणवाडी सेविकांसाठी राज्यस्तरीय पुरस्कार | रु.५०००/- प्रति सेविका | | राज्य स्तरावर - रु. १०,०००/- प्रति सेविका (१२७५ पुरस्कार) | ६०:४० | रु.५०००/- |
| २० | सरकारी मालकीच्या इमारतींमध्ये विद्यमान आंगणवाडी केंद्रांत शौचालय बांधणे | अंगणवाडी केंद्रे | -- | - | रु.१२,००० / - प्रति अंगणवाडी केंद्र, (प्रतिवर्ष APIP नुसार) | ६०:४० | शासनाच्या मान्यतेनुसार |
| २१ | पिण्याच्या पाण्याची सुविधा | अंगणवाडी केंद्रे | -- | -- | रु.१०,०००/- प्रति अंगणवाडी केंद्राकरीता (प्रतिवर्ष APIP नुसार) | ६०:४० | शासनाच्या मान्यतेनुसार |
| २२ | फ्लेक्झी फंड<br>FLEXI FUND | १) अंगणवाडी सेविका / मिनी अंगणवाडी सेविका | रुपये १०००/- | ६०:४० | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र<br>१) रु.१,०००/- प्रतिवर्षी - आपतीग्रस्त (Disaster Area) उद्भवल्यास तसेच नक्षलग्रस्त अंगणवाडी केंद्र / मिनी | ६०:४० | - |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | २) सर्व केंद्रासाठी | | | अंगणवाडी केंद्रांना गरजा भागविण्यासाठी (गडचिरोली/ गोंदिया/ भंडारा/ चंद्रपुर) डावी कडवी विचारसरणी<br><br>२) याव्यतिरिक्त केंद्रासाठी १०० % राज्य हिश्यामधुन | १००% | |
| २३ | पोषण आहार समर्थन आणि गुणवत्ता नियंत्रण (उदा. नॅशलप न्युट्रीशन बोर्ड खारघर प्रयोगशाळा तयार करण्यात येत आहे. | | | | एफएनबी (स्थापन करावयाच्या प्रयोगशाळा बांधकामासाठी, पुरक पोषण आहार कार्यक्रम आणि पोषण समर्थन गुणवत्ता नियंत्रण) | | |
| २४ | अंगणवाडी कार्यकर्ती बिमा योजना (AKBY) | अंगणवाडी सेविका / मिनी अंगणवाडी सेविका/ मदतनीस | | | अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र<br>प्रधानमंत्री जीवन ज्योती बिमा योजना (PMJJBY) अंगणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस यांना ५० वर्षापर्यंत, प्रधानमंत्री सुरक्षा बिमा योजना (PMSBY) अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना ५९ वर्षापर्यंत व सुधारित अंगणवाडी कार्यकर्ती बिमा योजना (AKBY) अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना ५० व्या वर्षानंतर ०१/०६/२०१७ रोजी प्रमाणे (संपूर्ण बिमा हप्ता केंद्र सरकार / एलआयसी कडून) | | याबाबत स्वतंत्र सूचना निर्गमित करण्यात येतील. |
| २५ | वेतन | राज्यस्तर/ जिल्हास्तर/ प्रकल्पस्तर कार्यालयातील अधिकारी /कर्मचारी यांचे वेतन | नियमानुसार | ६०:४० | **अ)** केंद्र शासन वेतनासाठी २५% निधी उपलब्ध करुन देणारी पदे<br>**<u>जिल्हास्तर /प्रकल्पस्तर :-</u>**<br>१) DPOs :- जिल्हा कार्यक्रम अधिकारी- ३४ पदे | २५: ७५ | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | २) सहाय्यक (सनियंत्रण व मुल्यमापन)- ५७ पदे<br>३) बाल विकास प्रकल्प अधिकारी- ५५३ पदे<br>३) सहाय्यक (सनियंत्रण व मुल्यमापन)- ५५३ पदे<br>४) पर्यवेक्षिका-३८९९<br>उर्वरित ७५% निधीची तरतुद राज्य शासनाने करावयाची आहे<br>**ब**) राज्य शासनाने वेतनासाठी राज्य हिश्यातून १००% तरतुद करावयाची पदे<br>१) आयुक्तालयातील (खुद्द) सर्व संवर्ग पदे :- ४४<br>२) कार्यालयीन अधिक्षक पदे :-३४<br>३) वरिष्ठ लिपिक/लेखापाल पदे :- ३४<br>४) कनिष्ठ लिपिक पदे :-३४<br>५) वाहन चालक पदे :- २०<br>६) चतुर्थश्रेणी कर्मचारी पदे :-३४<br>७) सहाय्यक बाल विकास प्रकल्प अधिकारी पदे :-४६<br>८) लिपिक-टंकलेखक पदे :-५५३<br>९) वाहन चालक पदे :-१४१<br>१०) चतुर्थश्रेणी कर्मचारी पदे :-५५३ | | |

**टीप :- एकात्मिक बाल विकास सेवायोजनेतंर्गत यापुर्वी राबविण्यात येणा-या वरील बाबींव्यतिरिक्त अन्य सर्व बाबी केंद्र शासनाने खंडीत केलेल्या आहेत. त्यामुळे यापुढे अंगणवाडी सेवा या उपयोजनेखालील वर नमुद केलेल्या बाबींसाठी निधी अनुज्ञेय राहील.**

*********************